**सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (सर्वसाधारण) घटकांतर्गत प्राप्त प्रशासकीय खर्चासाठीचा केंद्र शासनाच्या हिश्श्याचा निधी रु.३१,६०,००,०००/- व राज्य समरुप हिस्सा रु.२१,०६,६६,६६६/- एवढा निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०२३/प्र.क्र.१६२/योजना-१०**
**बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,**
**फोर्ट, मुंबई - ४०० ००१.**
**तारीख: २१ मार्च,२०२४.**

**<u>वाचा</u> :-**

१) संचालक (ग्रामीण गृहनिर्माण), ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार,नवी दिल्ली यांचे क्र. J-१२०२५/१/२०२३-RH-Accts.- Maharashtra (E.File No.३८४११८), दि.१३.०३.२०२४ रोजीचे आदेश.

२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण यांचे पत्र क्र.जा.क्र. राव्यक-ग्रागृ/लेखा (प्रआयो)/1st installment/सर्वसाधारण/२०२३-२४/५५०, दि.१३.०३.२०२४.

३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३

४) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०८.१२.२०२३

५) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.३८/अर्थसंकल्प-३, दि.२०.०३.२०२४

**<u>शासन निर्णय</u>:-**

केंद्र शासनाने संदर्भीय दि.१३.०३.२०२४ रोजीच्या आदेशान्वये, प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (सर्वसाधारण) घटकांतर्गत प्रशासकीय खर्चासाठी वितरीत केलेला सन २०२३-२४ या वर्षासाठीचा पहिल्या हप्त्याचा दुसरा भाग म्हणून रु.३१,६०,००,०००/- ( अक्षरी रुपये एकतीस कोटी साठ लक्ष फक्त ) व राज्य समरुप हिस्सा रु.२१,०६,६६,६६६/- (अक्षरी रुपये एकवीस कोटी सहा लक्ष सहासष्ट हजार सहाशे सहासष्ट फक्त ) असे एकूण रू. ५२,६६,६६,६६६/- (अक्षरी रुपये बावन्न कोटी सहासष्ट लक्ष सहासष्ट हजार सहाशे सहासष्ट फक्त ) एवढा निधी खर्च करण्यास व अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**(कृ.मा.प.)**

२. सदर निधी सन २०२३-२४ या वर्षातील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. केंद्र शासनाच्या हिश्श्याचा निधी मागणी क्र. एल-३, २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७०२ जवाहर ग्रामसमृध्दी योजना, (०१ )प्रधानमंत्री आवास योजना, (०१)(०४) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) - सर्वसाधारण (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्राचा हिस्सा ६० %) (कार्यक्रम) ३१ सहायक अनुदाने, (वेतनेतर) (२५०५३०१२), या लेखाशिर्षाखाली करुन त्याखालीच खर्ची टाकण्यात यावा. तसेच राज्य शासनाच्या हिश्श्याचा निधी मागणी क्र. एल-३, २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७०२ जवाहर ग्रामसमृध्दी योजना, (०१) प्रधानमंत्री आवास योजना, (०१)(०१) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) - सर्वसाधारण ( राज्याचा हिस्सा ४० %) (कार्यक्रम ) ३१ सहायक अनुदाने, ( वेतनेतर) (२५०५ ०५६८), या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती कार्यासन योजना-२ यांना सादर करण्यात यावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा देयक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयात नोंद झालेल्या रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

४. प्रस्तुत निधीबाबत उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण-गृहनिर्माण हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून (संकेतांक क्रमांक १२०१००५१८३) तसेच संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण - गृहनिर्माण हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधीचे देयक ठाणे कोषागार अंतर्गत उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर येथे पारित करण्यात यावेत.

५. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२३ निधी वितरणाबाबतच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ व दिनांक ०८ डिसेंबर, २०२३ च्या शासन परिपत्रकातील, केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत निधी वितरणाबाबतच्या अटी व शर्तीनुसार तसेच विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

७. संदर्भीय क्र. ५ येथे नमूद केलेल्या वित्त विभागाच्या दिनांक २० मार्च, २०२४ रोजीच्या शासन परिपत्रकामधील सूचनांचे तंतोतंत पालन करण्याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२११५००१४२४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sangeeta Madan Kholgadge

Digitally signed by Sangeeta Madan Kholgadge
DN: cn=Sangeeta Madan Kholgadge, o=Rural Development Department, ou, email=sangeeta.kholgadge@nic.in, c=US
Date: 2024.03.21 17:50:03 +05'30'

**(सं. म. खोलगाडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच जादा प्रतींसह)

२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, ४ था मजला, दक्षिण कक्ष, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.

३) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे .

४) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.

५) नियोजन विभाग (का.१४४४) , मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

६) वित्त विभाग (व्यय-१५) व (अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

७) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.

८) निवड नस्ती (योजना-१०).